सन २०२२-२३ करीता मिशन वात्सल्य या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत स्पॉन्सरशिपकरीता निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बालविकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-बीजीटी-२०२२/प्र.क्र.६२/का-०८**
नवीन प्रशासन भवन,तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक-३१ मार्च, २०२३

वाचा:-

१. महिला व बाल विकास मंत्रालय, नवी दिल्ली, यांचे पत्र क्र.CW-II -२२/३/२०२१-CW-II (e-९२८४३), दि.३१/०३/२०२३

प्रस्तावना :-

महिला व बाल विकास विभागाअंतर्गत केंद्रपुरस्कृत मिशन वात्सल्य योजनेसाठी सन २०२२-२३ या अर्थसंकल्पीय वर्षाकरीता केंद्र व राज्य हिश्यापोटी अनुक्रमे रू. ९७०२.०६लक्ष व रु.६४५८.०३लक्ष असा एकूण रु. १६१६०.०९लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

२. केंद्र शासनाकडून वाचा क्र. १ अन्वये मिशन वात्सल्य योजनेअंतर्गत स्पॉन्सरशिपकरीता रू.२१२६.२२ लक्ष निधी केंद्र हिस्सा वितरीत करण्यात आला आहे. सदर निधी व त्यांस आनुषंगिक राज्य हिस्सा आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना वितरीत करण्याची बाब शासन विचाराधीन आहे.

शासन निर्णय :-

मिशन वात्सल्य अंतर्गत स्पॉन्सरशिपकरीता प्राप्त केंद्रीय सहाय्याच्या अनुषंगाने विवरणपत्रातील मधील लेखाशीर्ष/उद्दीष्टांना रकाना क्र. ४व ६ प्रमाणे आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना या शासन निर्णयाद्वारे निधी वितरीत करण्यात येत आहे.

(रु.लक्ष)

| अ.क्र. | उद्दिष्ट | **मागणी क्र. एक्स ०१, २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण, १०२, बालकल्याण, (१६) शासकीय संस्था, (१६) (०१) एकात्मिक बाल संरक्षण योजना (२२३५ C००९), केंद्रहिस्सा,** | | **मागणी क्र. एक्स ०१, २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण, १०२, बालकल्याण, (१६) शासकीय संस्था, (१६) (०२) एकात्मिक बाल संरक्षण योजना (२२३५ C०१८), राज्यहिस्सा,** | |
|---|---|---|---|---|---|
| | | अ.अंदाज | प्रस्तावित वितरण | अ.अंदाज | प्रस्तावित वितरण |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| २ | ३१, सहायक अनुदान (वेतनेत्तर) | ३७५४.५० | १२६८.५१ | २४९३.०० | ८४५.६७ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | **मागणी क्र. एक्स ०१, २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण, १०२, बालकल्याण, १९९,इतर अशासकीय संस्थांना सहाय (००)(०२) एकात्मिक बाल संरक्षणयोजना (२२३५ C०२७), केंद्रहिस्सा,** | | **मागणी क्र. एक्स ०१, २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण, १०२, बालकल्याण, १९९,इतर अशासकीय संस्थांना सहाय (००)(०२) एकात्मिक बाल संरक्षणयोजना (२२३५ C०३६), राज्यहिस्सा,** | |
| | | अ.अंदाज | प्रस्तावित वितरण | अ.अंदाज | प्रस्तावितवितरण |
| १ | ३१, सहायक अनुदान (वेतनेत्तर) | ३४८४.८२ | ८३८.९७ | २३२३.२१ | ५५९.३२ |
| | **एकूण** | | **२१०७.४८** | | **१४०४.९९** |
| | **एकुणात एकूण** | **३५१२.४७** | | | |

२. सदर निधी वितरणाकरीता सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य बाल संरक्षण सोसायटी,पुणे तथा आयुक्त, महिला व बालविकास आयुक्तालय,पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर योजनेअंतर्गत उपलब्ध करून देण्यात आलेल्या निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र विहीत नमुन्यात सादर करणेची जबाबदारी नियंत्रक अधिकारी यांची राहील.

३. सदर निधी आहरण व विनियोगाच्या अनुषंगाने केंद्रशासन व राज्यशासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचना, वित्त विभागाचे निर्देश यांचे अनुपालन होईल याची दक्षता नियंत्रक अधिकारी व आहरण व सवितरण अधिकारी यांची राहील.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १३९ /व्यय ६, दि.३१.०३.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०३३११३०११५४४३० असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUNIL DEORAO SARDAR

Digitally signed by SUNIL DEORAO SARDAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=c0098eb68042c66b72115bc62ef9206ece42981aab126657128d7cadca447533, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=778B75C2C14BADBE6832D77601CF425AA7979B907650965C83919DBA7DC458C7, cn=SUNIL DEORAO SARDAR
Date: 2023.03.31 22:57:54 +05'30'

**( सुनिल सरदार)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष/ सदस्य, विधानसभा/ विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, मुंबई

५. मा.मंत्री, महिला व बाल विकास यांची खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव,मंत्रालय,मुंबई
७. सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
१०. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
११. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
१२. सर्व उपसचिव, सर्व अवर सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. उपायुक्त (बाल विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे
१४. कार्यक्रम व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य बाल संरक्षण सोसायटी, पुणे.
१५. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-६/ अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई
१६. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का-१४७२), मंत्रालय, मुंबई
१७. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सदर निधी बी.डी.एस. प्रणालीवर वितरीत करण्याच्या विनंतीसह अग्रेषित.
१८. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
१९. सर्व कार्यासने, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२०. निवड नस्ती, का-०८.